डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती सहायक अनुदान सन २०२४-२५ (अनिवार्य) (सहावा हप्ता)

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विप्रप्र-२०२४/प्र.क्र.३७/२४/प्रशि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२५

**वाचा :-** (१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र., अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थसंकल्प-३, दि. २५.०७.२०२४.
(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. विप्रप्र-२०२४/प्र.क्र.३७/२४/प्रशि-४,दि. १५.०४.२०२४
(३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. विप्रप्र-२०२४/प्र.क्र.३७/२४/प्रशि-४,दि. २१.०६.२०२४
(४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. विप्रप्र-२०२४/प्र.क्र.३७/२४/प्रशि-४,दि. ०१.१०.२०२४
(५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. विप्रप्र-२०२४/प्र.क्र.३७/२४/प्रशि-४,दि. ०६.११.२०२४
(६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. विप्रप्र-२०२४/प्र.क्र.३७/२४/प्रशि-४,दि. ३०.१२.२०२४
(७) संचालक, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती, यांचे पत्र क्र. प्रशा/व.लि./कावि-६६/निधी-मागणी/२०२५, दिनांक १३.०१.२०२५.

**प्रस्तावना :-**

डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता "मागणी क्रमांक : ए-४ मुख्य लेखाशीर्ष २०७०-इतर प्रशासनिक सेवा-००३ प्रशिक्षण (००)(०८) डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहायक अनदान (अनिवार्य) (२०७० ०७५५) या लेखाशीर्षाखाली ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाकरिता रु. ११०.०० लाख एवढी अर्थसंकल्पीय तरतुद करण्यात आली आहे. सदर मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाखाली रु. ९३.५० लाख इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणाली (बीम्स) वर प्रत्यक्ष वितरणासाठी उपलब्ध झाला आहे.

सदर निधीपैकी संदर्भाधीन क्रमांक (२), (३), (४), (५) व (६) येथील शासन निर्णयान्वये "डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती" या संस्थेस ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाकरिता रु. ७८.१० लाख एवढा निधी आतापर्यंत वितरीत करण्यात आला आहे. आता संदर्भाधीन क्रमांक (७) येथील पत्रान्वये संस्थेने वेतन खर्चासाठी निधीची मागणी केली आहे. त्यानुसार ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टावरील खर्च भागविण्यासाठी निधी संस्थेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र : ए-४, प्रधान लेखाशीर्ष २०७०, सहायक अनुदान (अनिवार्य) (२०७० ०७५५) या लेखाशीर्षाखाली ३६ सहायक अनुदाने (वेतन) उद्दिष्टाकरिता रुपये ११०.०० लाख इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर केली आहे. सदर मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीपैकी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या निधीतून माहे जानेवारी २०२५ ते माहे फेब्रुवारी २०२५ या कालावधीतील वेतनावरील खर्चासाठी संस्थेस ३६ सहायक अनुदाने (वेतन) उद्दिष्टाकरिता, २०७० ०७५५ या लेखाशिर्षाखाली रु. १२,५३,०००/- (रुपये बारा लाख, त्रेपन्न हजार फक्त) इतका निधी मंजूर व वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता "मागणी क्रमांक : ए-४ मुख्य लेखाशीर्ष २०७०-इतर प्रशासनिक सेवा-००३ प्रशिक्षण (००)(०८) डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहायक अनदान (अनिवार्य) (२०७० ०७५५) या लेखाशीर्षाखाली ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाकरिता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम संबंधित कोषागारातून काढण्यात आल्यानंतर महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी तसेच सहायक अनुदाने (वेतन) याखाली झालेल्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे, आणि संस्थेने आर्थिक वर्ष २०२४-२५ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सीमित ठेवावा.

४. डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

५. संस्थेने वित्त विभागाच्या दिनांक २५.०७.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र. ८ मध्ये नमूद केल्यानूसार देयक कोषागार अधिकारी यांना सादर करताना संस्थेचे मागील महिन्यातील बँक अकाउंट स्टेटमेंट (Bank Account statement) देयकासोबत जोडण्यात यावे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२४, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ अन्वये, प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१४१२१८१७०६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMRATA SHASHANK BHARSAKHALE

Digitally signed by NAMRATA SHASHANK BHARSAKHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=afc239a04f8765fdfaff5b427895a52f52390a276568759df519aea12578512c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E7A55E217A5A7B81D43819C528413DCC573FB455C923C289F62184B4155ED280, cn=NAMRATA SHASHANK BHARSAKHALE
Date: 2025.02.14 12:19:27 +05'30'

**( नम्रता भारसाखळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) संचालक, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
(२) विभागीय आयुक्त, अमरावती
(३) उप संचालक, लेखा व कोषागारे, अमरावती
(४) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
(५) उप कोषागार कार्यालय, अमरावती

(६) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई

(७) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर

(८) वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई

(९) अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

(१०)निवड नस्ती (सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-(१२अ) प्रशि-४